**केंद्र शासनाच्या “स्वच्छ भारत अभियान (नागरी)” च्या धर्तीवर राज्यामध्ये राबविण्यात येणाऱ्या “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” साठी राज्य अभियान संचालनालय व त्या अंतर्गत प्रकल्प व्यवस्थापन कक्षाच्या निर्मितीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वभाअ २०१५/ प्र.क्र.२३/ नवि ३४**
शहीद भगतसिंग चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: २४ एप्रिल, २०१५

**प्रस्तावना-**

केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर राज्यामध्ये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” राबविण्यास दिनांक १९ मार्च, २०१५ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत शासनाने मान्यता दिली आहे. त्या अनुषंगाने स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) च्या अंमलबजावणीसाठी सविस्तर मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत. शासनस्तरावर स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) करिता स्वतंत्र राज्य अभियान संचालनालय व त्या अंतर्गत प्रकल्प व्यवस्थापन कक्ष निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून, केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर राज्यामध्ये “स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)” च्या अंमलबजावणीसाठी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांमधील परिच्छेद ११.२.२ मध्ये नमूद केल्यानुसार, राज्यस्तरावर नगर विकास विभागांतर्गत “राज्य अभियान संचालनालय” नव्याने निर्माण करून ते कार्यरत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या अभियान संचालनालयामार्फत स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापन व त्या अनुषंगाने बाबींच्या अंमलबजावणीचे सनियंत्रण व इतर बाबींचे कामकाज करण्यात येईल.

(१) राज्य अभियान संचालक हे राज्य अभियान संचालनालयाचे प्रमुख असतील.

(२) राज्य अभियान संचालकांसाठी मंत्रालयातील सह सचिव / उप सचिव दर्जाचे एक पद या अभियान कालावधीसाठी नव्याने निर्माण करण्यास व सदर पद भारतीय प्रशासन सेवेमधील अधिकाऱ्यांच्या अथवा सुयोग्य अशा अधिकाऱ्याच्या नियुक्तीने भरण्यास मान्यता देण्यात येत

आहे. सदर पदनिर्मितीमुळे येणाऱ्या वार्षिक रू १० ते १५ लक्ष एवढा आवर्ती खर्च राज्याच्या निधी मधून करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(३) राज्य अभियान संचालक हे या अभियानाच्या अंमलबजावणीसाठी मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीचे व सचिव (नवि-२) यांच्या अध्यक्षतेखालील संनियंत्रण व अंमलबजावणी समितीचे सदस्य सचिव असतील.

(४) राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थाच्या स्तरावर तयार करावयाचे स्वच्छतेचे नियोजन, आराखडा, प्रकल्प तयारी, प्रकल्प मंजूरी, अंमलबजावणी व मूल्यमापन आणि यासाठी संपूर्ण राज्यभर समान कार्यपध्दती तयार/ सूचित करतील.

(५) स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत नगर विकास विभागामार्फत सर्व महानगरपालिका, "अ" वर्ग व "ब" वर्ग नगरपालिकांमधील शौचालय बांधकाम व सर्व महानगरपालिका व नगरपालिकांमधील घनकचरा व्यवस्थापन व पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत "क" वर्ग नगरपालिका व नगरपंचायती मधील शौचालय बांधकाम करण्यात येणार आहे. त्यामुळे नगर विकास विभाग व पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत करण्यात येणाऱ्या कामामध्ये समन्वय घडवून अभियानांतर्गत कार्यक्रमाचे सनियंत्रण राज्य अभियान संचालक करतील.

(६) अभियान संचालकांना मदत करण्यासाठी राज्य स्तरावर प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (Project Management Unit (PMU) निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या कक्षामध्ये अभियान कालावधीसाठी (२ ऑक्टोबर, २०१९ पर्यंत) खालील तज्ञ / कर्मचारी कंत्राटीपध्दतीने नियुक्त करण्यास मान्यता देण्यात येत आहे

| (i) | क्षमता बांधणी तज्ञ | १ पद |
|---|---|---|
| (ii) | माहिती, शिक्षण व प्रसार तज्ञ | १ पद |
| (iii) | घन कचरा व्यव्यस्थापन तज्ञ | १ पद |
| (iv) | देखरेख व मूल्यमापन (एम आणि ई ) तज्ञ | १ पद |
| (v) | माहिती व तंत्रज्ञान तज्ञ | १ पद |
| (vi) | लघुलेखक | १ पद |
| (vii) | शिपाई | १ पद |

(७) उपरोक्तपैकी अ.क्र. (i) ते (v) येथील तज्ञांना त्यांचा संबंधित क्षेत्रामधील कामाचा अनुभव विचारात घेवून दरमहा रू ४०,००० ते रू. ६०,००० पर्यत मानधन देण्यात येईल. तर,

लघुलेखकास रू २५,००० दरमहा व शिपाई रू १०,००० दरमहा असे मानधन देण्यात येईल. या कंत्राटी कर्मचाऱ्यांचे मानधन व भत्ते केंद्र शासनाकडून स्वच्छ भारत अभियानांतर्गत, क्षमताबांधणी आणि आस्थापना व कार्यालयीन खर्च या बाबीसाठी राज्यस्तरावर उपलब्ध होणाऱ्या तरतूदी मधून भागविण्यात येईल.

(८) उपरोक्त तज्ञांसाठी आवश्यक शैक्षणिक अर्हता व अनुभव याबाबी राज्य अभियान संचालक, सचिव (नवि-२) नगर विकास विभाग यांच्या मान्यतेने निश्चित करतील.

(९) उपरोक्त तज्ञांना त्यांचा संबंधित क्षेत्रातील अनुभव विचारात घेवून देय होणाऱ्या मानधनाबाबतचा निर्णय राज्य अभियान संचालक, सचिव (नवि-२) नगर विकास विभाग यांच्या मान्यतेने घेतील.

**०२.** राज्य अभियान संचालक यांचे वेतन, भत्ते व अनुषंगिक बाबीवर खर्च करण्याच्या अनुषंगाने लेखाशिर्षाबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

**०३.** सदरचा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनै.सं.क्र. ८३/१४४४ दिनांक २७.२.२०१५ व अनै.सं.क्र.१२२/ व्यय-३ दिनांक ७.३.२०१५ अन्वये प्राप्त अभिप्रायांचा विचार करून राज्य मंत्रिमंडळाने दिनांक १९.३.२०१५ रोजी घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२४१६१७३७२०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2015.04.24 17:38:45 +05'30'

**( सुधाकर ज्ञा. बोबडे )**

अवर सचिव महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव ( सर्व).

३. मा. राज्यमंत्री सर्व विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

५. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. अप्पर मुख्य सचिव, (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. प्रधान सचिव (नगर विकास-१), मंत्रालय, मुंबई.

९. सचिव (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई.

१०.आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.

११.सचिव, आदिवासी विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२.महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३.महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.

१४.महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.

१५.सर्व विभागीय आयुक्त.

१६.सर्व जिल्हाधिकारी.

१७.उप सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८. आयुक्त, सर्व महानगरपालिका.

१९. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती.

२०. निवडनस्ती (नवि-३४).